गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणाकरीता ( एम.ई ) करण्याकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रतिनि-३५१७/प्र.क्र.७१/१७/तांशि-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १५ जुलै, २०१७.

वाचा :

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/ (१९५/९५)/तांशि-४, दि. २० नोव्हेंबर, १९९६.
२) शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/१९५/९५)/तांशि-४, दि. २८ ऑक्टोबर,१९९८.
३) तंत्रशिक्षण संचालनालयाचे क्र.४अ/आस्था/ पीएच.डी-एम.ई/प्रतिनि/२०१७-१८/४३२, दि. २३ मे,२०१७ व क्र.४अ/आस्था/ पीएच.डी-एम.ई/प्रतिनि/२०१७-१८/४३२, दि. १२ जुलै,२०१७ रोजीचे पत्र.
४) उच्च व तंत्रशिक्षण विभाग समक्रमांकाचे शासन निर्णय दि.०४ जुलै, २०१७.

**शासन निर्णय:**

शासकीय तंत्रनिकेतनातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या दोन अधिव्याख्यात्यांची गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणाकरीता (एम.ई.) अभ्यासक्रमासाठी सन २०१७-२०१८ या शैक्षणिक वर्षापासून तीन (०३) वर्षे कालावधीसाठी त्यांचे नावासमोरील संस्थेमध्ये निवड झालेली आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत असलेल्या संस्थेचे नाव | उच्च शिक्षणाकरीता (एम.ई.) प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नांव |
|---|---|---|---|
| १ | श्री. गजानन शिवाजी चौधरी, अधिव्याख्याता,अणुविद्युत अभियांत्रिकी | शासकीय निवासी महिला तंत्रनिकेतन, तासगांव | नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ टेक्निकल टिचर्स ट्रेनिंग अॅण्ड रिसर्च, चंदीगड. |
| २ | श्री. बादशाह प्यारेलाल मुल्ला, अधिव्याख्याता,संगणक अभियांत्रिकी | शासकीय निवासी महिला तंत्रनिकेतन, तासगांव | नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ टेक्निकल टिचर्स ट्रेनिंग अॅण्ड रिसर्च, चंदीगड. |

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रतिनि-२०९५/१९५५७/(१९५/९५)/तांशि-४, दि.२० नोव्हेंबर,१९९६ व दि. २८ ऑक्टोबर, १९९८ या अनुसार विहीत करण्यांत आलेल्या खालील नमूद अटीं व शर्तीच्या अधिन राहून उपरोक्त विवरणपत्रात नमूद दोन अध्यापकांना उच्च शिक्षणाकरीता त्यांची निवड झालेल्या संस्थेमध्ये प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१) प्रतिनियुक्ती पूर्ण निर्धारित कालावधीकरिता असेल.
२) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित अध्यापकाच्या जागेवर दुस-या व्यक्तीची नियुक्ती करण्यास मान्यता असेल.
३) सदर दोन अधिव्याख्यात्यांना खालील अट क्र.८ चे अधिन राहून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालखंडात नियमानुसार अनुज्ञेय असलेले वेतन व भत्ते देय राहतील.
४) त्यांच्या वेतनाव्यतिरिक्त ज्या संस्थेत प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले त्या संस्थेने त्यांना विद्यावेतन शिष्यवृत्ती दिल्यास ती स्विकारण्यास त्यांना परवानगी देण्यात येत आहे.

५) प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी जाण्यासाठी किंवा प्रतिनियुक्तीच्या कालावधीत तसेच प्रतिनियुक्ती संपल्यावर मुख्यालयात परत येण्यासाठी त्यांना प्रवासभत्ता वा दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

६) सदर दोन अधिव्याख्यात्यांना त्यांच्या उर्वरित सेवा कालावधीत कधीही अध्ययन रजा घेता येणार नाही व तसे बंधपत्र प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी त्यांना कार्यालयाकडे द्यावे लागेल.

७) संबंधित अभ्यासक्रमासाठी करारनिर्दिष्ट काळापेक्षा जास्त कालावधी वाढवून मिळण्यास त्यांनी अर्ज केल्यास प्रतिनियुक्तीच्या वाढलेल्या कालावधीसाठी त्यांची देय व अनुज्ञेय रजा समजण्यात येईल.

८) प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर कार्यरत संस्थेची सलग ०६ वर्षे सेवा करण्याचे बंधपत्र त्यांना प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी द्यावे लागेल. हे बंधपत्र त्यांना शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही १०६८/डी-१०/,दि.१५/१०/१९९८ व शासन ज्ञापन सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०६९, दिनांक २१/०६/१९७९ मध्ये विहीत केल्याप्रमाणे द्यावे लागेल.

९) सदर दोन अधिव्याख्याते हे जर त्यांचे प्रशिक्षण अर्धवट सोडून येतील किंवा बंधपत्राप्रमाणे संस्थेत सेवा करणार नसतील, तर त्यांच्याकडून शासनाने त्यांच्यावर केलेला संपूर्ण खर्च प्रचलित व्याजासह वसूल करण्या येईल.

१०) प्रतिनियुक्तीचा कालावधी सेवा काळ म्हणून समजण्यात यावा.

११) सदर प्रशिक्षणासाठीची प्रतिनियुक्ती त्यांच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचा-यांच्या अगोदर पदोन्नतीसाठी आधारभूत ठरु शकणार नाही.

३. उपरोक्त नमूद क्र. ६ व ८ बाबींवरील बंधपत्रे संबंधित अध्यापकास प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी घेण्याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. तसेच त्यांना सदर संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. असे प्रमाणित करण्यांत येते की, सदर दोन अधिव्याख्यात्यांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार एम. ई. अभ्यासक्रमासाठी पाठविण्यांत आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात त्याच पदावर स्थानापन्न राहीले असते.

५. सदर शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. प्रतिनि-२०९५/१९५५७/ (१९५/९५)/तांशि-४, दिनांक २०/११/१९९६ व दि. २८/१०/१९९८ मधील अटी व शर्ती तसेच तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१५१२२०१४१४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.07.15 12:17:29 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

संबंधित अधिव्याख्याते (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा. अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. सहसंचालक, विभागीय कार्यालय, पुणे (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
४. प्राचार्य, शासकीय निवासी महिला तंत्रनिकेतन, तासगांव (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
६. जिल्हा कोषागार आधिकारी, सांगली.
७. निवड नस्ती-तांशि-७.